नॅशनल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि.निमशिरगांव, ता.शिरोळ, जि.कोल्हापूर या संस्थेस राष्ट्रीय सहकारी विकास योजनेअंतर्गत अर्थसहाय्याच्या अंतिम हप्त्यापोटी रा.स.वि.नि. कर्ज, रा.स.वि.नि. भागभांडवल व शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) मंजूर करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: प्रक्रिया-२०२२/प्र.क्र.३२/१-स**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दि.३१ मार्च, २०२२.

वाचा:-

१) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: प्रक्रिया-११२००४/प्र.क्र. १६२(अ)/९-स, दि. १२.१०.२००७.

२) शासन परिपत्रक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.प्रक्रिया-११०९/प्र.क्र.१०५/९-स, दि.०९.१०.२००९.

३) रा.स.वि.नि. नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ३-४२/२०१७-FG/२९५/SA७०१९३/२७५, दि. ०८.०२.२०१८

४) शासन निर्णय क्र. प्रक्रिया-१११८/प्र.क्र.१३६/१-स, दि.२३.१०.२०१८

५) शासन निर्णय क्र.प्रक्रिया-१११८/प्र.क्र.१३६/१-स, दि.०६.०३.२०१९

६) पणन संचालक, पणन संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. पणन-२/कृप्रउ/नॅशनल ॲग्रो /जागा बदल मान्यता /२०२०/२७४९, दि.१०.०८.२०२२.

७) पणन संचालक, पणन संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. पणन-२/कृउप्र/नॅशनल ॲग्रो /निमशिरगाव /उ.अ.प्र. /वै.का.व. /२०२२/११८३/२२, दि.२२.०३.२०२२.

प्रस्तावना:-

**नॅशनल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि.निमशिरगांव, ता.शिरोळ, जि.कोल्हापूर** या संस्थेमार्फत **"भात प्रक्रिया"** करण्याबाबतचा प्रकल्प उभारण्यात येत असून, राज्यातील शेतकऱ्यांनी उत्पादित केलेल्या शेतमालाला योग्य भाव मिळावा म्हणून सहकारी संस्थांना १:९ या प्रमाणात शासकिय भागभांडवल व रा.स.वि.नि. कर्ज देण्याबाबत संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार सदर संस्थेच्या प्रकल्पाची वित्तीय सहाय्यासाठी राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडे शिफारस करण्यात आलेली होती. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने संदर्भ क्र.३ येथील दि.०८.०२.२०१८ च्या पत्रान्वये सदर प्रकल्पास किंमत रु.४३७.१८ लक्ष इतके अर्थसहाय्य मंजूर करण्यात आले असून, संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२३.१०.२०१८ च्या शासन निर्णयान्वये खालील आकृतीबंधानुसार प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

**(रु. लाखात)**

| अ.क्र. | तपशिल | टक्केवारी | आर्थिक आकृतीबंध |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि.या संस्थेकडून कर्ज | ६०% | २६२.३१ |
| २ | रा.स.वि.नि. कडून शासनास गुंतवणूक कर्ज तथा शासनाकडून संस्थेस भागभांडवल | ३६% | १५७.३८ |
| | एकूण | **९६%** | **४१९.६९** |
| ३ | संस्थेचे स्वभागभांडवल | ०४% | १७.४९ |
| | **एकूण:-** | **१००%** | **४३७.१८** |

सदर संस्थेस संदर्भ क्र.५ येथील दि.०६.०३.२०१९ च्या शासन निर्णयान्वये पहिल्या हप्त्यापोटी रा.स.वि.नि. कर्ज रु.६३.०० लक्ष व शासकिय भागभांडवल (कोल्हे समिती) रु.२०.०० लक्ष असे एकूण रु.८३.०० लक्ष इतके अर्थसहाय्य वितरित करण्यात आलेले आहे. सद्यस्थितीत सदर संस्थेस दुसऱ्या व अंतिम हप्त्यापोटी देय असलेले रा.स.वि.नि. कर्ज रू.१९९.३१ लक्ष, रा.स.वि.नि. भागभांडवल रू.१३१.१५ लक्ष व शासकिय भागभांडवल (कोल्हे समिती) रु. ६.२३ लक्ष असे एकूण रू.३३६.६९ लक्ष इतके अर्थसहाय्य वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

या शासन निर्णयाद्वारे नॅशनल अॅग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि.निमशिरगांव, ता.शिरोळ, जि.कोल्हापूर या संस्थेस उपरोक्त आकृतीबंधात दर्शविण्यात आल्यानुसार **रा.स.वि.नि. कर्जाच्या पुढील अंतिम हप्त्यापोटी रा.स.वि.नि. कर्ज (६४२५ ०३१३) या लेखाशिर्षाखाली रू.१,९९,३१,०००/- (रु. एक कोटी नव्याण्णव लक्ष एकतीस हजार फक्त), रा.स.वि.नि. भागभांडवल (४४२५ ०२९४) या लेखाशिर्षाखाली रू.१,३१,१५,०००/- (रु.एक कोटी एकतीस लक्ष पंधरा हजार फक्त) व शासकीय भागभांडवल (४४२५ ०७५९) या लेखाशिर्षाखाली रु.६,२३,०००/- (रु. सहा लक्ष तेवीस हजार फक्त)** असे एकूण **रु.३,३६,६९,०००/- (रु. तीन कोटी छत्तीस लक्ष एकोणसत्तर हजार फक्त)** वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

०२. कर्जाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या दि.०८.०२.२०१८ रोजीच्या मंजूरी आदेशाप्रमाणे राहतील. शासकिय भागभांडवलाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती शासन निर्णय दि.१२.१०.२००७ व संदर्भ क्र.२ येथील दि.०९.१०.२००९ च्या परिपत्रकातील तरतूदीनुसार राहतील. तसेच संस्थेस आतापर्यंत मंजूर झालेल्या रकमेएवढया किमंतीच्या संस्थेची मालमत्ता तारण ठेवण्याची व त्या मालमत्तेवर शासनाचा बोजा चढविणे तसेच, आता संस्थेस वितरीत करण्यात येत असलेल्या रक्कमेच्या २० टक्के इतक्या रक्कमेची संचालकाकडून वैयक्तिक मालमत्तेचे तारण गहाण लिहून घेणे बंधनकारक राहिल.सदर प्रकल्प ६ महिन्याच्या आत कार्यन्वित करावा व ६ महिन्यानंतर शासनाचे अर्थसहाय्याची परतफेड संस्थेने करावी याबाबतचे हमीपत्र संस्थेकडून स्टॅम्प पेपरवर आवश्यक त्या उचित प्राधिकाऱ्यामार्फत AFFIRM व SWEAR करुन घेण्यात यावे. त्याशिवाय सदर मंजूर अर्थसहाय्य वितरित करण्यात येऊ नये. या अटीची पूर्तता झाली किंवा कसे याबाबतची खात्री संचालक (पणन) यांनी करावी व मगच निधी वितरीत करण्यात यावा.

०३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या उक्त रकमांचे आहरण करुन वरील परिच्छेद ०२ मधील अटींची पूर्तता करुन नॅशनल अॅग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि.निमशिरगांव, ता.शिरोळ, जि.कोल्हापूर या संस्थेला अर्थसहाय्य वितरित करण्याकरिता लेखाधिकारी, पणन संचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या स्वतंत्र लेखाशीर्षाखालील रकमा जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे येथून आहरित करुन संस्थेस वितरित करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी यांनी करावी. त्यास अनुसरुन **रा.स.वि.नि. कर्ज (६४२५ ०३१३) या लेखाशिर्षाखाली रू.१,९९,३१,०००/- (रु. एक कोटी नव्याण्णव लक्ष एकतीस हजार फक्त), रा.स.वि.नि. भागभांडवल (४४२५ ०२९४) या लेखाशिर्षाखाली रू.१,३१,१५,०००/- (रु.एक कोटी एकतीस लक्ष पंधरा हजार फक्त) व शासकीय भागभांडवल (४४२५ ०७५९) या लेखाशिर्षाखाली रु.६,२३,०००/- (रु. सहा लक्ष तेवीस हजार फक्त)** असे एकूण **रु.३,३६,६९,०००/- (रु. तीन कोटी छत्तीस लक्ष एकोणसत्तर हजार फक्त)** इतक्या रकमांचे स्वतंत्र धनादेश ,

**"नॅशनल अॅग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि.निमशिरगांव, ता.शिरोळ, जि.कोल्हापूर"**

"NATIONAL AGRO PROCESSING CO-OP. INDUSTRIES LTD.,NIMSHIRGAON TAL.SHIROL, DISTRICT KOLHAPUR"

च्या नावाने काढून वितरित करण्यात यावेत.

**०४.** कर्जाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या दि.०८.०२.२०१८ रोजीच्या मंजूरी आदेशाप्रमाणे तसेच, दि.१२.१०.२००७ च्या शासन निर्णयानुसार, दि.०९.१०.२००९ च्या परिपत्रकानुसार व वेळोवेळी निर्गमित केलेल्या/केल्या जाणाऱ्या शासन परिपत्रक व मार्गदर्शक सूचनांनुसार राहतील. शासकिय भागभांडवलाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती शासन निर्णय दि.१२.१०.२००७ नुसार व दि.०९.१०.२००९ च्या परिपत्रकानुसार राहतील. त्याचप्रमाणे दि.२३.१०.२०१८ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती लागू राहतील. संस्थेला निधी उपलब्ध करुन दिल्यानंतर सदर निधीचा विनियोग तात्काळ होऊन संस्था उत्पादनाखाली येईल व त्यांच्याकडून अर्थसहाय्याची परतफेड विहीत कालावधीत सुरु होईल, याची जबाबदारी संबंधीत जिल्हा उपनिबंधक व संचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे यांची राहील. संस्थेने प्रकल्प उभारणीच्या जागा बदलाच्या प्रस्तावास व वैद्यता कालावधीस राष्ट्रीय सहकार विकास निगम यांची मान्यता घ्यावी.

**०५.** वरीलप्रमाणे मंजूर केलेला खर्च,

**अ)** रा.स.वि.नि. कर्ज (६४२५ ०३१३) या लेखाशिर्षाखाली **रू.१,९९,३१,०००/- (रु. एक कोटी नव्याण्णव लक्ष एकतीस हजार फक्त)** चा खर्च “मागणी क्र. व्ही.-५,६४२५- सहकारासाठी कर्जे, (००)(१०८) इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०२) सहकारी प्रक्रिया संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०२)(०१) सहकारी शेती प्रक्रिया संस्थांना कर्जे (राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ)(कार्यक्रम) (६४२५ ०३१३) ५५- कर्जे व आगाउ रकमा” या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

**ब)** रा.स.वि.नि. भागभांडवल (४४२५ ०२९४) या लेखाशिर्षाखाली **रू.१,३१,१५,०००/- (रु.एक कोटी एकतीस लक्ष पंधरा हजार फक्त)** चा खर्च “मागणी क्र. व्ही.-३,४४२५- सहकारावरील भांडवली खर्च, (००)(१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका, (०२) सहकारी संस्करण संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत- योजना, राज्य योजनांतर्गत योजना (००)(०२) कृषि संस्करण संस्थेला (राष्ट्रीय सहकार विकास महामंडळ) भागभांडवली अंशदान (४४२५ ०२९४)-३२- अंशदाने” या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

**क)** शासकीय भागभांडवल (४४२५ ०७५९) या लेखाशिर्षाखाली **रु.६,२३,०००/- (रु. सहा लक्ष तेवीस हजार फक्त)** चा खर्च “मागणी क्र. व्ही.-३,४४२५- सहकारावरील भांडवली खर्च, (००)(१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका, (०२) सहकारी संस्करण संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत- योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२)(०८) कृषि प्रक्रिया संस्थांना भागभांडवली अंशदान (कोल्हे कमिटी) (राज्य योजना) (४४२५ ०७५९)-३२- अंशदाने” या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

**०६.** सदरच्या रकमेचा विनियोग संस्था आवश्यक त्याच बाबींकरिता करीत आहे, याबाबतचे नियंत्रण पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा. त्याचप्रमाणे पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर यांनी संस्थेच्या कामकाजावर आणि विहीत वेळेत प्रकल्प उभारणी करण्यात येत आहे, यावर लक्ष ठेवावयाचे आहे. संस्थेच्या कामाच्या प्रगतीचा तिमाही अहवाल जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर यांनी पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावा. पणन संचालक यांनी सदर अहवाल तपासून परस्पर राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली व क्षेत्रीय कार्यालय, पुणे यांना न चुकता दर तीन महिन्यांनंतर सादर करावा व त्याची प्रत शासनास पाठवावी. जर या कामी संस्थेकडून अनियमितता झाल्यास अर्थसहाय्याची एकरक्कमी वसुली करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील.

**०७.** संस्थेस यापूर्वी देण्यात आलेल्या अर्थसहाय्यातून संस्थेने प्रकल्प उभारणीच्या अनुषंगाने केलेले बांधकाम व इतर कामे अर्धवट असल्यास, आता मंजूर करण्यात येत असलेल्या अर्थसहाय्यातून ६ महिन्यांच्या आत पूर्ण करावीत व प्रकल्प कार्यान्वित करावा. शासन निर्णय दि.१२.१०.२००७ च्या तरतूदीनुसार प्रकल्प कार्यान्वित होऊन उत्पादनाखाली आल्यानंतर ६ महिन्यांनी शासनाने दिलेल्या

अर्थसहाय्याची तिमाही वसुली संबंधित जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था व सहसंचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे यांनी सुरु करावी. याची संपूर्ण जबाबदारी त्यांची राहील. वसुलीचा वार्षिक अहवाल शासनास सादर करावा. त्यानुसार वेळेचे बंधन पाळण्यात यावे. त्याची जबाबदारी जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर व सहसंचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे यांची राहील व सदर कामावरील नियंत्रण पणन संचालकांचे राहील.

०८. या प्रकल्प खर्चामध्ये वाढ झाल्यास सदर वाढीव किंमत संस्थेने स्वबळावर उभी करावयाची आहे. वाढीव प्रकल्प किंमतीमध्ये शासनाच्या कोणताही अर्थसहाय्याचा सहभाग असणार नाही, याची संस्थेने नोंद घ्यावी. **नॅशनल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि.निमशिरगांव, ता.शिरोळ, जि.कोल्हापूर** या संस्थेस शासनाच्या व निगमाच्या भागभांडवलाच्या /कर्जाच्या नेहमीच्या अटी व शर्ती (त्यात काही सुधारणा/बदल असल्यास त्यासह) बंधनकारक राहतील.

०९. प्रस्तुत संस्थेच्या संचालक मंडळाची जेंव्हा जेंव्हा निवडणुक होईल तेंव्हा तेव्हा नवीन संचालक मंडळास ३ महिन्याच्या आत संस्थेस मंजुर करण्यात आलेल्या कर्ज व शासकीय भाग भांडवलाच्या अनुषंगाने २० टक्के स्व-मालमत्ता शासनाकडे तारण म्हणुन ठेवावी लागेल तसेच नव्याने नियुक्त संचालक मंडळाने / संचालकांने असे तारण दिल्यानंतर पूर्वीच्या वैयक्तिक तारण दिलेल्या संचालक मंडळास / संचालकांस तारणमुक्त करता येईल, अशी सुधारणा संस्थेच्या Bye Laws मध्ये करण्याबाबत संचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

१०. सदर संस्थेस बांधकाम व यंत्रसामुग्रीकरिता ई-टेंडरींग प्रक्रीयांचे अवलंबन करणे बंधनकारक राहील. तसेच विविध खरेदीच्या अनुषंगाने विहीत खरेदी पध्दतीचा अवलंब करणे बंधनकारक राहील व खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नांवे ECS बँक प्रणाली द्वारे अदा करावी, याबाबतचे नियंत्रण संचालक (पणन), पणन संचालनालय,पुणे यांनी ठेवावे. तसेच प्रकल्पाची यंत्रसामुग्री शासन तारण/गहाण करुन घेण्याची जबाबदारी संचालक (पणन), पणन संचालनालय, पुणे यांची राहील.

११. यामधून खरेदी होणार असल्यास प्रत्यक्ष वस्तू प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा केले जावे व खरेदी केलेल्या वस्तुंची नोंद जड वस्तू संग्रह नोंदवहीमध्ये( Dead Stock) करण्यात यावी व त्यांचा योग्य वापर होत असल्याची खातरजमा करण्यात यावी याबाबतचे नियंत्रण पणन संचालनालय/संबधीत जिल्हा उपनिबंधक यांनी ठेवावे.

१२. महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, नियम १४८ व १५३ अन्वये शासनाने दिलेली कर्जे व त्यावरील व्याजाची वेळचेवेळी वसुली नियमितपणे केली जात आहे व त्या सरकारी लेख्यात यथोचितरित्या जमा केल्या जात आहेत. यावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय नियंत्रक अधिकाऱ्याची आहे. तसेच, दिलेल्या कर्जासंबंधीचे अभिलेख संकलित करणे, लेखे अद्यावत ठेवणे आणि त्या संदर्भातील इतर आवश्यक कार्यवाही करणे ही जबाबदारी देखील संबंधित नियंत्रक अधिकाऱ्याची आहे. या संदर्भातील सूचना वित्त विभागामार्फत यापूर्वीच देण्यात आल्या आहेत.

१३. प्रस्तुत आदेश नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१६७/१४३१, दि.२९.०३.२०२२ व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२२०/२०२२/व्यय-२, दि.२९.०३.२०२२ अन्वये मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३११४११०३७७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2022.03.31 14:14:52 +05'30'

**(डॉ.सुग्रिव धपाटे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (सहकार व पणन) यांचे विशेष कार्य अधिकारी
२. मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव
३. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
६. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०. व्यवस्थापकिय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ४, सिरी इन्स्टिटयुशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली- ११००१६.
११. प्रादेशिक संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५, बी.जे.रोड, पुणे-१.
१२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्या.१४३१) मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२)/(अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई.
१६. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर.
१७. लेखाधिकारी, पणन संचालनालय, म.रा. पुणे-१.
१८. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९. अध्यक्ष, “नॅशनल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि.निमशिरगांव, ता.शिरोळ, जि.कोल्हापूर”
२०. निवडनस्ती (१-स).

**************************